**सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गात सरळसेवेने नियुक्त झालेल्या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. एमएफएस-२०१४/ प्र.क्र.१९८/फ-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. १६ ऑगस्ट, २०१७

वाचा :- १) शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्र.एमएफएस-१०८७/७५/प्र.क्र.२३/फ-८, दि.१२/०३/१९९८.

२) शासन आदेश,म.व व.वि., क्र.एमएफएस-१२१०/ प्र.क्र.८२ / फ-८, दि.२/०७/२०११.

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर यांचे पत्र क्र. मवसे/परिविक्षा/प्र.क्र.१६/ भाग-२/५४ / १२४४/ १७-१८ /कक्ष-९, दि.३१/७/२०१७,

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र वनसेवा परिक्षा -२००८ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) (वेतनश्रेणी ९३००-३४८००+ ग्रेड पे-५०००) संवर्गातील पदावर नियुक्तीसाठी शिफारस केलेल्या उमेदवारांपैकी २० उमेदवारांनी शासन अधिसूचना, दि.१२/०३/१९९८ मधील तरतुदीनुसार सन २०११ -२०१३ या कालावधीत राज्य वन सेवा केंद्रीय अकादमी, कोईम्बतूर व राज्य वन सेवा केंद्रीय अकादमी,डेहराडून येथून २ वर्षाचे नियुक्तीपूर्व प्रशिक्षण पाठयक्रम यशस्वीरित्या पूर्ण केलेले आहे.

महाराष्ट्र वनसेवा परिक्षा -२००७ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) (वेतनश्रेणी ९३००-३४८००+ ग्रेड पे-५०००) संवर्गातील पदावर नियुक्तीसाठी शिफारस केली आहे. कु.गंगावणे या दि.१/०१/२०१४ रोजी विभागीय परिक्षा उत्तीर्ण झाल्या आहेत तथापि हिंदी भाषा परिक्षा अनुत्तीर्ण असल्यामुळे त्यांचा परिविक्षाधीन कालावधी अद्याप समाप्त करण्यात आला नव्हता. विभागीय सहाय्यक भाषा संचालक, औरंगाबाद यांनी १५/११/२०१६ च्या पत्रान्वये कु.गंगावणे या दि.१० जुलै २०१६ रोजी घेण्यात आलेल्या हिंदी भाषा परिक्षा उत्तीर्ण झाल्या असल्याचे कळविले आहे. तसेच एतदर्थ मंडळाची परिक्षा संपल्याच्या लगतची तारीख ही परिक्षा उत्तीर्ण झाल्याची तारीख समजण्यात यावी असेही कळविले आहे.

शासन अधिसूचना, दि.१२/०३/१९९८ मधील तरतुदीनुसार या अधिकाऱ्यांनी राज्य वन सेवा केंद्रीय अकादमी, कोईम्बतूर व राज्य वन सेवा केंद्रीय अकादमी,डेहराडून येथून २ वर्षाचे

नियुक्तीपूर्व प्रशिक्षण पाठयक्रम यशस्वीरित्या पूर्ण केलेले आहे. सदर उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन आदेश :-**

सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गात सरळसेवेने नियुक्त करण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस करण्यात आलेल्या व २ वर्षाचा नियुक्तीपूर्व प्रशिक्षण पाठयक्रम यशस्वीरित्या पूर्ण केलेल्या १५ उमेदवारांना एक वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती देण्यात आलेली होती. सदर अधिकाऱ्यांपैकी १५ अधिकाऱ्यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण केल्याबाबतची परिपूर्ण माहिती अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर कार्यालयाकडून प्राप्त झाली आहे. त्यानुसार खालील ९ अधिकाऱ्यांचा त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

| अ.क्र. | सहायक वनसंरक्षकाचे नाव | परिविक्षा कालावधी | परिविक्षा कालावधी समाप्तीचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | श्री.एम.बी.नाईकवाडी | दि.२६/७/२०१३ ते २५/७/२०१४ | **२४/२/२०१५** |
| २ | श्री.एच.एस.बाघमोडे | दि.२२/७/२०१३ ते २१/७/२०१४ | **२४/२/२०१५** |
| ३ | श्री.एस.डी.गवते | दि.२५/७/२०१३ ते २४/७/२०१४ | **२४/२/२०१५** |
| ४ | श्री.यु.सी.ढगे | दि.२६/७/२०१३ ते २५/७/२०१४ | **२४/२/२०१५** |
| ५ | श्री.वाय.एस.बहाळे | दि.२६/७/२०१३ ते २५/७/२०१४ | **२३/७/२०१६** |
| ६ | श्री.एस.बी.कंद | दि.२९/७/२०१३ ते २९/७/२०१४ | **२३/७/२०१६** |
| ७ | श्री.एस.एस.भागवत | दि.२९/७/२०१३ ते २९/७/२०१४ | **२३/७/२०१६** |
| ८ | कु.रेवती कुलकर्णी | दि.२६/७/२०१३ ते २५/७/२०१४ | **२३/७/२०१६** |
| ९ | कु. प्रियंका नवनाथ गंगावणे | दि. २६/७/२०११ ते ३१/७/२०१२ | **११/७/२०१६** |

**२.** महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने घेतलेल्या विभागीय परिक्षेत वरील तक्त्यातील अ.क्र.१ ते ४ येथील उमेदवार हे दि.२४/०२/२०१५ रोजी उत्तीर्ण झाले असून, अ.क्र. ५ ते ८ येथील उमेदवार हे दि.२३/७/२०१६ रोजी उत्तीर्ण झाले आहेत. सदर उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करताना उमेदवार ज्या दिनांकाला विभागीय परिक्षा उत्तीर्ण झाले आहेत, तो दिनांक विचारात घेण्यात आलेला आहे.

**३.** कु. प्रियंका नवनाथ गंगावणे या दि.१/०१/२०१४ रोजी विभागीय परिक्षा उत्तीर्ण झाल्या आहेत तथापि हिंदी भाषा परिक्षा अनुत्तीर्ण असल्यामुळे त्यांचा परिविक्षाधीन कालावधी अद्याप समाप्त करण्यात आला नव्हता. विभागीय सहाय्यक भाषा संचालक, औरंगाबाद यांनी

दि.१५/११/२०१६ च्या पत्रान्वये कु.गंगावणे या दि.१० जुलै २०१६ रोजी घेण्यात आलेल्या हिंदी भाषा परिक्षा उत्तीर्ण झाल्या असल्याचे कळविले आहे. तसेच एतदर्थ मंडळाची परिक्षा संपल्याच्या लगतची तारीख ही परिक्षा उत्तीर्ण झाल्याची तारीख समजण्यात यावी असेही कळविले आहे. त्यानुसार कु.गंगावणे यांचा दि. ११ जुलै २०१६ पासून परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यात येत आहे.

**४.** प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर यांनी सर्व संबंधितांना कळवून उपरोक्त अधिकाऱ्यांच्या सेवापुस्तकात योग्य ती नोंद घेण्याची कार्यवाही करावी.

**५.** सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०८१६१७३०५५९४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil N. Dhas

Digitally signed by Anil N. Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, cn=Anil N. Dhas
Date: 2017.08.16 17:21:33 +05'30'

**(अनिल धस)**
कार्यासन अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक,सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक.
७) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर
८) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव).
९) सर्व मुख्य वनसंरक्षक व उपमहासंचालक, सामाजिक वनीकरण
१०) संबंधित अधिकारी / अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक(कार्मिक), नागपूर यांचे मार्फत.
११) निवड नस्ती (फ-८ कार्यासन)महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.